एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत आदिवासी प्रकल्पांमधील अंगणवाडी सेविका/मिनी अंगणवाडी सेविका/मदतनीस याची रिक्त पदे भरण्यास मंजूरी देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१८/प्र.क्र.२०२/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ८ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :** - (१) महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र. एबावि-२०१२/प्र.क्र.४२९/का.६, दिनांक १३ ऑगस्ट २०१४

(२) महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र. एबावि-२०१६/प्र.क्र.२३०/का.६, दिनांक २२ सप्टेंबर २०१६

(३) महिला व बाल विकास विभाग,पत्र.क्र.एबावि-२०१६/प्र.क्र.१८०/का.६, दिनांक ७ सप्टेंबर २०१७

(४) मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या राज्य शक्ती प्रदान कार्यक्रम समितीची दिनांक २५/७/२०१८ रोजी दुपारी ३.३० वाजता आयोजित बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

अंब्रेला एकात्मिक बाल विकास सेवा योजना या मुख्य योजनेखाली राबविण्यात येणा-या "**अंगणवाडी सेवा**" या उपयोजनेखाली यापुढे अंगणवाडी केंद्रे तसेच क्षेत्रिय कार्यालये कार्यरत रहाणार आहेत. केंद्र शासनाने एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत राबविण्यात येणारे विविध उपक्रम खंडीत केलेले आहेत. तसेच या योजनेतंर्गत मंजूर पदांपैकी काही पदांचे वेतन २५% केंद्र शासन देणार असून उर्वरित सर्व पदांचे वेतन राज्य शासनास अदा करावे लागणार आहे. सेविकांचे मानधन अदा करण्यासाठी केंद्र शासन ६०% राज्य ४०% याप्रमाणे निधीचे प्रमाण आहे. प्रत्यक्षात मंजूर APIP नुसार केंद्र शासनाकडून निधी वेळेत प्राप्त होत नाही. अंगणवाडी केंद्रे यांचा आढावा घेऊन अल्प उपस्थितीच्या अंगणवाडयांचे एकत्रिकरण करणे, अंगणवाडी मधील बालकांसाठी आधार कार्ड नोंदणी बंधनकारक करणे, सुधारित अंगणवाडयांची संख्या निश्चित होईपर्यंत सेविकांची रिक्त पदे न भरण्याबाबत वित्त विभागाने सूचना दिलेल्या होत्या.त्यानुसार कार्यवाही करण्याबाबत दिनांक ७ सप्टेंबर २०१७ च्या पत्रान्वये आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांना कळविण्यात आले होते. आदिवासी भागातील अंगणवाडी केंद्रांमधील अंगणवाडी सेविका/ मिनी अंगणवाडी सेविका/ मदतनीस यांची रिक्त पदे भरण्याबाबत लोकप्रतिनिधींकडून सातत्याने मागणी होत असल्यामुळे निती आयोगाचे महत्वकांक्षी

जिल्हे नंदुरबार, गडचिरोली, उस्मानाबाद, वाशिम तसेच डावी कडवी विचारसरणी यांमधील गोंदिया, चंद्रपूर व भंडारा जिल्ह्यातील काही भाग (डावी कडवी विचारसरणी अंतर्गत येणाऱ्या जिल्ह्यांची अद्यावत यादीनुसार). तसेच पालघर संपूर्ण जिल्हा, अमरावती जिल्ह्यातील मेळघाट, धारणी आणि चिखलदरा या प्रकल्प / तालुक्यातील अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांची रिक्त पदे भरण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

निती आयोगाचे महत्वकांक्षी जिल्हे नंदुरबार, गडचिरोली, उस्मानाबाद, वाशिम तसेच डावी कडवी विचारसरणी यांमधील गोंदिया, चंद्रपूर व भंडारा जिल्ह्यातील काही भाग (डावी कडवी विचारसरणी अंतर्गत येणाऱ्या जिल्ह्यांची अद्यावत यादीनुसार). तसेच पालघर संपूर्ण जिल्हा, अमरावती जिल्ह्यातील मेळघाट, धारणी आणि चिखलदरा या प्रकल्प / तालुक्यातील अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांची रिक्त पदे **दिनांक १ नोव्हेंबर २०१८ पासून** भरण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविकांची रिक्त पदे भरताना शासनाच्या दिनांक १३ ऑगस्ट २०१४ च्या शासन निर्णयातील व दिनांक २२ सप्टेंबर २०१६ च्या शासन निर्णयातील कार्यपध्दतीचे तंतोतंत पालन करण्यात यावे. अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांच्या मानधनी सेवा भरती प्रक्रियेत शासनाने वेळोवेळी केलेल्या सुधारणा नव्याने भरती केलेल्या सर्व सेविकांना लागु रहातील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००८१७४५२३१२३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.10.08 17:48:04 +05'30'

(ला.रा.गुजर)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
५. अपर मुख्य सचिव ( नियोजन.),नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
६. अपर मुख्य सचिव ( वित्त) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई

७. अपर मुख्य सचिव,शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई
८. प्रधान सचिव ( वित्तीय सुधारणा),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
९. प्रधान सचिव ( आदिवासी विकास) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. प्रधान सचिव-२,नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
११. प्रधान सचिव ,सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,
१२. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. सचिव,महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१४. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई
१५. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. महासंचालक,माहिती व प्रसिध्दी,मंत्रालय,मुंबई
१७. सर्व विभागीय आयुक्त
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२०. सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका
२१. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
२२. सर्व महिला व बाल विकास अधिकारी (जिल्हापरिषद)
२३. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी )
२४. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका,
२५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
२६. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन,मुंबई
२७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
२९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
३०. निवड नस्ती (कार्यासन ६)